**अवर्षणामुळे बाधीत विशेषत:यवतमाळ व उस्मानाबाद जिल्हातील शेतकऱ्याकरीता विशेष मदतीचा कार्यक्रम पथदर्शी तत्वावर तयार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र.आस्था- २०१५ प्र.क्र.१४३/का-१**

३ रा मजला, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
तारीख: २९ जुलै ,२०१५

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील दुष्काळ ,टंचाई, गारपीट, अवकाळी पाऊस इत्यादी नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्याच्या दृष्टीकोनातून परिणामकारक कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने विविध उपाय योजनां राबविण्याची बाब विचाराधीन होती. उक्त कार्यक्रमांतर्गत महिला व बाल विकास विभागातंर्गत खालील उपाय योजना राबविण्याचे प्रस्तावित आहे.

१. कृषि विभागामार्फत आदिवासी भागात राबविण्यात येत असलेली परसबाग योजना राज्यातील ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील अंगणवाडीमधील लाभार्थी कुटुंबासाठी जिल्हा नियोजन विकास समिती (DPDC) मार्फत राबविण्यात यावी.
२. अंगणवाडी व मिड डे मेल स्कीम अंतर्गत संपूर्ण प्रक्रियायुक्त पदार्थ फक्त महिला गटांमार्फत घेणे व त्यासाठी आत्महत्या प्रवण भागात विशेष कार्यक्रम राबविणे.
३. शुभमंगल सामूहिक/नोंदणीकृत विवाह योजना तसेच निराधार,परित्यक्ता व विधवांच्या मुलींच्या विवाहासाठी योजना सर्वांसाठी राबविणे.
४. आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांमध्ये तेजस्विनी व कृषि समन्वयित विकास प्रकल्प राबविणे.

सदर योजनांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने दि.१२.७.२०१५ रोजी मंत्रीमंडळापुढे प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावावर मंत्रीमंडळ बैठकीमध्ये खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

"प्रशासकीय विभागांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मुद्दयांमध्ये निश्चित धोरणानुसार विविध उपाययोजना यांना सक्षम प्राधिकाऱ्याकडून मान्यता, त्यांची प्रत्यक्ष अंमलबजावणी, त्यावरील संनियंत्रण, आवश्यक वित्तीय तरतूद, निधी उपलब्धता याबाबतची प्रशासकीय कार्यवाही संबंधित विभागांनी स्वतंत्रपणे करावी."

उपरोक्त मंत्रिमंडळ बैठकीमधील निर्णयास अनुलक्षून वरील उपाय योजनाच्या अंमलबजावणीबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील दुष्काळ ,टंचाई, गारपीट, अवकाळी पाऊस इत्यादी नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत विशेषत: यवतमाळ व उस्मानाबाद जिल्हयातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्याच्या दृष्टीकोनातून मंत्रिमंडळाने वर दिलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करून विभागातील वरील योजना राबवण्याची कार्यवाही तात्काळ करावी व तसेच या संदर्भात नाविन्यपुर्ण काही कार्यवाही आवश्यक असल्यास त्याबाबत शासनास कळवावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१२३७०९३३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shobha Shivaji Matre

Digitally signed by Shobha Shivaji Matre
DN: CN = Shobha Shivaji Matre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.07.29 17:04:33 +05'30'

**शो.शि.मत्रे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
२. मा.मंत्री(म.व.बा.वि.) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (म.व.बा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
५. आयुक्त, महिला व बाल विकास ,आयुक्तालय,पुणे.
६. आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, (ICDS), रायगड भवन, नवी मुंबई.
७. व्यवस्थापकिय संचालक,महिला आर्थिक विकास बांद्रा (पूर्व), मुंबई -५२
८. महासंचालक,राजमाता जिजाऊ माता व बाल, आरोग्य व पोषण मिशन ,नवी मुंबई.
९. प्रधान सचिव महिला व बाल विकास विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१०.सर्व उप सचिव अवर सचिव (का-६)/कक्ष अधिकारी (का-२,का-५ व का-१०), महिला व बाल विकास विभाग
११.कक्ष अधिकारी म-७ , महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई ३२.
१२.निवड नस्ती का-१.